**शेतामध्ये किटकनाशक फवारणी करीत असताना होणाऱ्या विषबाधा, धार्मिक ठिकाणी/सार्वजनिक ठिकाणी होणाऱ्या चेंगराचेंगरीच्या घटना तसेच निवासी इमारती कोसळण्याच्या घटनांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना मदत देण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक :- सीएलएस-२०१९/प्र.क्र.१३२/म-३,**

हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक :- १० फेब्रुवारी, २०२०

<u>वाचा</u> :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- आरएलएफ-११.०३/प्र.क्र.३१०/म-३, दि.२४.०८.२००४

२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- आरएलएफ-२०१४/प्र.क्र.३२९/म-३, दि.०५.०१.२०१६

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक :- सीएलएस-२०१८/प्र.क्र.९८/म-३, दि.१९.०७.२०१८

४) जिल्हाधिकारी, वर्धा यांचे पत्र क्र.अका/नैआ/मु.स.नि./कावि-२८०८/२०१९, दि.२२.११.२०१९

<u>प्रस्तावना :-</u>

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दहशतवादग्रस्त व दंगलग्रस्त आपदग्रस्तांना मदत देऊन त्यांचे पुनर्वसन करण्याबाबतची योजना अंमलात आणण्यात आली आहे. या घटनांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांना द्यावयाच्या मदतीचे दर संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सुधारित करण्यात आले असून यामध्ये नक्षलवादी कारवायांमध्ये बाधित होणाऱ्या आपदग्रस्तांचा समावेश करण्यात आलेला आहे. या घटनांव्यतिरिक्त इतर अनेक मानव निर्मित आपत्तीच्या घटना घडतात जेथे अशा घटनांमधील आपदग्रस्तांना सहानुभूतीच्या दृष्टीकोनातून तातडीने मदत देणे आवश्यक असते. तथापि अशा प्रकरणी मदत देण्याबाबत शासनाचे कायमस्वरूपी धोरण नसल्यामुळे अशा आपदग्रस्तांना तातडीने मदत देण्यामध्ये अडचणी निर्माण होतात. मा.उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांनी जनहित याचिका क्रमांक ११३/२०१७ मध्ये दिनांक २२.०२.२०१८ रोजी दिलेले आदेश विचारात घेऊन वर नमूद घटनेव्यतिरिक्त इतर मानव निर्मित घटनांमध्ये बाधित होणाऱ्या व्यक्तींना मदत देण्यासाठी स्वतंत्र योजना संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये अंमलात आणण्यात आली आहे.

त्यानुसार जिल्हाधिकारी, वर्धा यांनी शेतामध्ये किटकनाशक फवारणी करीत असताना मृत्यू झालेल्या श्री. विठ्ठल भास्कर भूसारी यांच्या वारसदारांना आर्थिक मदत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.४ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याप्रकरणी सर्व बाबी विचारात घेऊन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

शेतामध्ये किटकनाशकाची फवारणी करीत असताना झालेल्या विषबाधेमध्ये मृत झालेल्या श्री. विठ्ठल भास्कर भूसारी, रा. अल्लीपूर, ता. हिंगणघाट, जि. वर्धा यांच्या वारसदारांना रू.४.०० लक्ष (रूपये चार लक्ष फक्त) एवढी मदत अदा करण्यास याव्दारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील मृत व्यक्तिंच्या वारसदारांना अदा करावयाची रक्कम विभागीय आयुक्त, अमरावती यांच्यामार्फत उपलब्ध करून देण्यात येत आहे. कक्ष अधिकारी म-११ यांनी सदर निधी अर्थसंकल्पित वितरण प्रणालीवर वितरीत करावा.

३. याबाबतचा खर्च, “मागणी क्र.सी-५, प्रधान लेखाशीर्ष-२२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२, समाज कल्याण, १०४, वृध्द, विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण, (००)७०१८ अपघातग्रस्तांना आर्थिक मदत (अनिवार्य) (२२३५ ०३११) ३१, सहाय्यक अनुदाने" या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा आणि त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर प्रकरणी खर्चाचे पत्रक विहित कालमर्यादेत न चुकता महसूल व वन विभागास प्राप्त होईल याची संबंधित विभागीय आयुक्त तसेच जिल्हाधिकारी यांनी दक्षता घ्यावी. तसेच प्रचलित नियमानुसार मदतीचे वाटप करण्यात यावे.

५. नियंत्रक अधिकारी यांना असेही कळविण्यात येते की, सदर मदतीची रक्कम विनाविलंब वितरीत करावी. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही यांची दक्षता घ्यावी. अनुदान वाटपासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास तात्काळ पाठविण्यात यावे. याबाबतचा खर्चाचा मेळ महालेखापाल यांनी नोंदविलेल्या खर्चाशी घेण्यात यावा व महालेखापालाच्या ताळमेळ प्रमाणपत्रासह विनियोजन लेखे शासनाकडे तात्काळ पाठवावेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००२१०१४४५२६७६१९ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=9ce356f38c6a70a8ffde299ad6627f48bd01e875a7aca38bd139b0cc5367e62d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2020.02.10 14:49:50 +05'30'

**( उदय गवस )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती,

२)जिल्हाधिकारी, वर्धा,

३) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

४) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर

५) अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई

६) संचालक लेखा व कोषागरे, संगणक शाखा, मुंबई,

७) कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प-१/म-११/पीएसी/पीएसी-१), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,

८) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा वर्धा,

९) निवडनस्ती (म-३ कार्यासन)